उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट-अ
संवर्गातील पदावरील पदोन्नतीबाबत.
निवडसूची वर्ष सन २०१६-१७ व २०१७-१८

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पदोन्न-२०२१/८५/प्र.क्र. २६/उद्योग-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १५ मार्च, २०२३.

**संदर्भ :-**

१) या विभागाचा शासन निर्णय क्रमांकः पदोन्न-१४१७/८५/प्र.क्र. २६/उद्योग-३, दिनांक ०२/०६/२०१७.
२) या विभागाचा शासन निर्णय क्रमांकः पदोन्न-१४१८/४४८/प्र.क्र. १०१/उद्योग-३, दिनांक ३१/१२/२०१८.
३) या विभागाचा शासन निर्णय क्रमांकः पदोन्न-२०२१/८५/प्र.क्र. २६/उद्योग-३, दिनांक १८/११/२०२१.

**प्रस्तावना :**

उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील उद्योग अधिकारी (तांत्रिक) गट-ब संवर्गातील श्री. सं.स. गवळी व श्री. उ. सु. दंडगव्हाण या २ अधिकाऱ्यांना निवडसूची वर्ष २०१६-१७ मधून संदर्भ क्र. १ च्या आदेशान्वये उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट-अ या पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात आली आहे. तसेच निवडसूची वर्ष २०१७-१८ मधून संदर्भ क्र. २ च्या आदेशान्वये श्रीमती सु. व. बावनकुळे, श्री. हे. के. बदर, श्री. सं.धा. बांगर, श्री. दि. कि. शिवदास, श्री. कि. व . जाधव व श्री. प्र. द. हणबर या ६ अधिकाऱ्यांना तदर्थ पदोन्नती देण्यात आली आहे. त्यापैकी एकूण ६ अधिकाऱ्यांच्या तदर्थ पदोन्नत्या हया उपरोक्त संदर्भ क्र. ३ येथील आदेशान्वये नियमित केलेल्या आहेत व २ अधिकाऱ्यांच्या तदर्थ पदोन्नत्या अद्याप नियमित झालेल्या नाहीत. तथापि, सदर ८ अधिकाऱ्यांना देण्यात आलेली पदोन्नती ही त्या वर्षीच्या पदोन्नती कोटयातील निव्वळ रिक्त असलेल्या पदावर देण्यात आली असल्यामुळे सदरच्या पदोन्नत्या या तदर्थ स्वरुपाच्या नसून तात्पुरत्या स्वरुपाची असल्याबाबत या विभागाची धारणा सामान्य प्रशासन विभागाने पक्की केली आहे. या धर्तीवर संदर्भीय आदेशांमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील उद्योग अधिकारी (तांत्रिक) गट-ब या पदावरुन उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट-अ या पदावर संदर्भिय क्र. १ व २ च्या आदेशांनुसार एकूण ८ अधिकाऱ्यांना देण्यात आलेली पदोन्नती ही तदर्थ स्वरुपा ऐवजी तात्पुरत्या स्वरुपाची असल्याचे याव्दारे सुधारित करण्यात येत आहे.

२. सदरचा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाचे अनौ. संदर्भ क्र. ३७/२०२३ दि. २०/०२/२०२३ अन्वये देण्यात आलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१५१४३८५९६८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHASHANK TUKARAM CHAVAN

Digitally signed by SHASHANK TUKARAM CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=7dd1791f8c7f2d8cbabbae6c3c11ac3d4fe93ccab49daf36ff24dacd585e2276,
pseudonym=ECC424589A881E3E8CAB5C4F3152EABAEE38E22E,
serialNumber=A089DF063F1FFA9C6E2D052DB3C26C5B1ECE40048A4A7D39615BEE66D9E2053D,
cn=SHASHANK TUKARAM CHAVAN
Date: 2023.03.15 14:43:39 +05'30'

**(शशांक चव्हाण)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई.
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
३. महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
४. उप सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. उद्योग सहसंचालक (सर्व).
६. सबंधित अधिकारी (उद्योग संचालनालयामार्फत).
७. निवडनस्ती (उद्योग-३).